महाराष्ट्र शासकीय कर्मचारी घरबांधणी अग्रिम नियम, १९६२ अन्वये मंजूर केलेल्या अग्रिमांच्या रकमेवरील व्याजाची तत्परतेने वसुली.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
परिपत्रक क्रमांक एचबीए १०८०/५९/जीईएन-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २४ एप्रिल १९८०.

## परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, कांही प्रकरणी जेथे शासकीय कर्मचा-यांना मुंबई वित्तीय नियमांन्वये अग्रिम मंजूर करण्यात आले होते अशा कर्मचा-यांनी अग्रिमांच्या मुद्दलाची परतफेड ठोक रकमेत किंवा संबंधित आदेशांमध्ये निर्दिष्ट केलेल्या हप्त्यांच्या संख्येपेक्षाही कमी हप्त्यात केली. परंतु त्यांनी मुद्दलावरील व्याज भरण्यास तात्काळ सुरुवात केली नाही. त्यासाठी सदर कर्मचा-यांनी असे कारण पुढे केले की, त्यांच्या करारपत्रातील अटीनुसार व्याजाचे हप्ते भरण्याची सुरुवात ब-याच कालावधीनंतर करावयाची आहे.

२. घरबांधणी अग्रिम नियम, १९६२ मधील नियम १४ च्या पोट नियम (क) या अन्वये कर्ज घेणा-या शासकीय कर्मचा-याची जर तशी इच्छा असेल, तर त्याला त्याने घेतलेल्या अग्रिमाची कमी कालावधीत परतफेड करण्याची मोकळीक आहे. पोट नियम (क) मध्ये अशी तरतूद आहे की मुद्दलाचा शेवटचा हप्ता ज्या महिन्यामध्ये परत फेडावयाचा असेल त्या महिन्यानंतर येणा-या महिन्यापासून व्याजाची वसुली सुरु झाली पाहिजे. म्हणून शासकीय कर्मचा-यांकडून एकदा मुद्दल वसूल झाल्यानंतर त्यांच्याकडून व्याजाच्या वसुलीस विलंब लावणे योग्य ठरत नाही.

३. म्हणून शासन असा निदेश देत आहे की विभाग प्रमुखांनी घरबांधणी अग्रिम मंजूर करणा-या आदेशामध्ये विनिर्दिष्टपूर्वक असे नमूद केले पाहिजे की, ज्या प्रकरणात घरबांधणी अग्रिमाची ठोक रकमेमध्ये परतफेड करण्यात येईल अथवा सदर आदेशातील अटींनुसार मान्य झालेल्या हप्त्यांच्या संख्येपेक्षा कमी हप्त्यांमध्ये परतफेड करण्यात येईल अशा प्रकरणात सुध्दा ज्या महिन्यामध्ये संपूर्ण मुद्दलाची परतफेड होईल त्या महिन्यानंतर येणा-या महिन्यापासून व्याजाची वसुली सुरु करण्यात येईल. अशा प्रकरणी व्याजाची वसुली ज्या महिन्यात मुद्दलाची पूर्णपणे परतफेड झाली असेल त्या महिन्यानंतरच्या महिन्यापासून व्याजाची वसुली सुरु करण्यात आली आहे, या गोष्टीची त्यांनी खात्री करुन घेतली पाहिजे. मुंबई वित्तीय नियमांत विहित केल्याप्रमाणे लेखापरीक्षा विभागाने व्याजाची रक्कम आकारणी-वरुन काढेपर्यंत अग्रिम मंजूर करणा-या विभाग प्रमुखांनी देय असलेल्या व्याजाची अंदाजे रक्कम काढावी आणि व्याजाची वसुली सुरु करावी. शासकीय कर्मचा-याने एकदा मुद्दलाची परतफेड केल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत देय असलेल्या व्याजाची वसुली लांबणीवर टाकण्यात येऊ नये. विभाग प्रमुखांना असे निदेश देण्यात येत आहेत की त्यांनी लेखा परीक्षा विभागाशी संपर्क साधावा आणि कर्ज घेणा-या शासकीय कर्मचा-याने देय असलेल्या व्याजाच्या रकमेची त्याच्याकडून तत्परतेने पडताळणी करुन घ्यावी.

४. ह्या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

व्ही.ए.कल्याणकर,
शासनाचे उपर सचिव,
वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (१६० प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (६० प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
राज्यपालांचे सल्लागार,
*प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मंत्रालयाचे सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
संपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, कार्यासन जीईएन-५, वित्त विभाग.

---

* पत्राद्वारे

क्रमांक दिनांक

यांच्या माहितीसाठी व मार्गदर्शनासाठी प्रत पाठविण्यात येत आहे.

Prompt Recovery of Interest on Advances sanctioned under M.G.S.H.B.A. Rules, 1962.

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Finance Department.
Circular No. HBA-1080/59/GEN-5
Mantralaya, Bombay 400 032, dated 24th April 1980.

CIRCULAR

Instances have come to the notice of Government where Government servants who are sanctioned advances under the Bombay Financial Rules, repaid the principal amounts of advances in lump-sum or earlier than the number of instalments stipulated in the respective orders, but did not start payment of interest thereon immediately thereafter on the plea that the payment of interest in instalments was to start much later in terms of the agreement executed.

2. According to sub-rule (c) of Rule 14 of the House Building Advance Rules, 1962 it is open to the loanee Government servant to repay the advance in a shorter period if he so desires. Sub-rule(f) lays down that the recovery of interest shall commence from the month following the month in which the last instalment of principal is payable. Therefore, it would not be in order to delay the recovery of interest once the principal is recovered from the Government servant.

3. Government is, therefore, pleased to direct that the Heads of Departments should specifically mention in the order sanctioning the House Building Advance that even in the case where the House Building Advance is repaid in lump-sum or in less number of instalments than those stipulated in the order, recovery of interest will start in the month following the month in which the principal stands wholly repaid. They should ensure that in such cases recovery of interest commences in the month following the month in which the principal amount is completely repaid. Till the amount of interest is worked out by the Audit as prescribed in the Bombay Financial Rules, the Heads of Departments sanctioning the advance may work out the approximate interest payable and start recovering the interest. Under no circumstances the recovery of interest payable should be delayed once the

principal amount is repaid by the Government servant. The Heads of Departments are directed to approach the Audit and get the interest amounts payable by the loanee Government servants verified by them promptly.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. A. KALYANKAR,
Under Secretary to Government,
Finance Department.

To

The Accountant General, Maharashtra-I, Bombay (160 copies),
The Accountant General, Maharashtra-II, Nagpur (40 copies),
The Pay and Accounts Officer, Bombay, etc.

(As per list given in Marathi version of the Government Resolution).